महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम २०११ मध्ये सुधारणा करणेसाठी समिती गठीत करणे.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः .एफआरए २०१६/(९५/१६)/ एसएम-६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ३२

तारीख: ६ मे, २०१७

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम, २०११ ची अंमलबजावणी दिनांक १.१२.२०१४ पासून संपूर्ण राज्यात करण्यात आली आहे. तसेच अधिनियमातील तरतूदींनुसार विभागीय शुल्क नियामक समिती व पुनरीक्षण समिती दिनांक १.४.२०१६ च्या अधिसूचनेन्वये गठीत करण्यात आल्या आहेत. तथापि, शुल्क वाढी संदर्भात पालकांच्या अनेक तक्रारी प्राप्त होत आहेत. या तक्रारींच्या अनुषंगाने सदर अधिनियमाची अंमलबजावणी करतेवेळी विभागीय शुल्क नियामक समित्यांना अधिनियमातील काही उणीवा आढळल्याने त्यानुसार सुधारणा करण्याची बाब निदर्शनास आली आहे. या सर्व बाबींचा अधिक अभ्यास करुन अधिनियमात आवश्यक त्या सुधारणा सुचविण्यासाठी अध्यक्ष ,पुनरीक्षण समिती यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम,२०११ मधील तरतूदींचा अभ्यास करुन अधिनियमात आवश्यक त्या सुधारणा करण्यासाठी मा.श्री.व्ही.जी.पळशीकर, अध्यक्ष, पुनरीक्षण समिती यांचे अध्यक्षतेखाली खालील समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | श्री. व्ही.जी. पळशीकर, पुनरीक्षण समितीचे अध्यक्ष | अध्यक्ष |
| २. | श्री.कृष्णप्रसाद रामचंद्र वॅरिअर, विभागीय शुल्क नियामक समिती, मुंबई चे अध्यक्ष | सदस्य |
| ३. | श्री. मोहन आवटे, विभागीय शुल्क नियामक समितीचे सदस्य | सदस्य |
| ४. | शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, पुणे | सदस्य |
| ५. | विभागीय शिक्षण उप संचालक, मुंबई | सदस्य |
| ६. | सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ७. | दोन शाळा व्यवस्थापन/शैक्षणिक संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य ( आमंत्रित) |
| ८. | दोन पालक प्रतिनिधी | सदस्य ( आमंत्रित) |
| ९ | उप सचिव (शाळा व्यवस्थापन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. वरील समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल.

(१) शुल्क वाढी संदर्भात प्राप्त झालेल्या तक्रारींचा अभ्यास करणे,

(२) सदर तक्रारींचा, शैक्षणिक धोरणांचा व अधिनियमातील तरतूदींचा अभ्यास करुन अधिनियमात आवश्यक त्या सुधारणा सुचविणे

(३) सुचविलेल्या सुधारणांचा अध्यादेश काढण्यासाठी प्रारुप तयार करणे.

(४) सदरहू समितीने वरील बाबींचा सखोल अभ्यास करून आपल्या शिफारशी १५ दिवसात शासनास सादर कराव्यात.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०६१६२९४७७४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Sangita Dinesh Shelke

Digitally signed by Sangita Dinesh Shelke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ace0ca0b129ab4da8f9e911057d75e7fbf6f6bd0b55e8ff7ca0deacfa15e1c0, cn=Sangita Dinesh Shelke
Date: 2017.05.06 16:32:13 +05'30'

**( संगिता शेळके )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
३. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
७. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/प्रौढ) जिल्हा परिषद
८. विभागीय शुल्क नियामक समिती/पुनरीक्षण समितीचे सर्व समिती सदस्य
९. निवड नस्ती (एसएम-६)